**संजय गांधी राष्ट्रीय उद्यानातील रखरखावाकरीता माहे सप्टेंबर, २०२१ ते माहे मार्च, २०२२ या कालावधीसाठी आवश्यक असलेला निधी स्वीय प्रपंची लेखामधून खर्च करण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०७.२१/प्र.क्र. १६२/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दिनांक २४.०६.२०२१.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष- २२(६)/यो/प्र.क्र. ७३ (११-१२)/२१-२२/२५८१/२१-२२, दिनांक १८.०१.२०२२.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात निधी वितरणाबाबत वित्त विभागामार्फत मार्गदर्शक सूचना जारी करण्यात आल्या आहेत. त्यानुसार संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्वीय प्रपंची लेख्यातील उपलब्ध असलेल्या रक्कमेमधून माहे सप्टेंबर, २०२१ ते माहे मार्च, २०२२ या कालावधीत उद्यानाच्या रखरखाव व इतर कामकाजाकरीता आवश्यक असलेला रु. ३८३.४१ लक्ष निधी खर्च करण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात माहे सप्टेंबर, २०२१ ते माहे मार्च, २०२२ या कालावधीत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या रखरखावाकरीता आवश्यक असलेली रक्कम **रु. ३८३.४१ लक्ष** खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे व खालील नमूद अटींच्या अधिन राहून संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्वीय प्रपंची लेख्यातील उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

**(रक्कम रु. लाखात)**

| अ.क्र. | कामाचा तपशिल | माहे सप्टेंबर, २०२१ ते मार्च, २०२२ करीता प्रस्तावित रुक्कम |
|---|---|---|
| १ | कृष्णगिरी उपवन वनक्षेत्रातील विविध रोजंदारी कामे जसे साफसफाई, देखभाल, संरक्षण इ. साठी कुशल, अकुशल उक्ते कामांची वाढीव दराने लागणारी मजुरी (कुशल मजुर २५ व अकुशल मजुर-२०० एकूण उक्ते मजूर-२२५ मजुर) (माहे नोव्हेंबर, २०२१ ते मार्च, २०२२) एकूण ५ महिन्यांची मंजूरी | १४०.५३ |
| २ | येऊर परिक्षेत्रासाठी मानपाडा, ससुपाडा विश्रामगृह व इत्यादी निसर्ग परिचय साफसफाई देखभालसाठी लागणारी मजुरी व जंगल संरक्षण कामाची मजुरी (३६-अकुशल व ११ कुशल असे एकूण ४७ मजुर) (माहे नोव्हेंबर, २०२१ ते मार्च, २०२२) एकूण ५ महिन्यांची मंजूरी | ३५.५८ |

| अ.क्र. | कामाचा तपशिल | माहे सप्टेंबर, २०२१ ते मार्च, २०२२ करीता प्रस्तावित रुक्कम |
|---|---|---|
| ३ | तुळशी लॉगहट रखरखाव व कान्हेरी परिमंडळ, रावळपाडा/मालाड रोपवन/घाणीखाचर/आंतरराष्ट्रीय प्राणीसंग्रहालय व पिल्टरपाडा / ठाकुरपाडा बॅरिअर गेट/तारासिंग गार्डन येथे लागणारी मजुरी व जंगल संरक्षण कामाची मजुरी (६ कुशल व ५९ अकुशल असे एकूण -६५ मजूर) (माहे नोव्हेंबर, २०२१ ते मार्च, २०२२) एकूण ५ महिन्यांची मंजूरी | ४०.६५ |
| ४ | कृष्णगिरी उपवन परिक्षेत्रातील शासकीय कार्यालये व विश्रामगृहांचे विद्युत, टेलिफोन, पाणी बिल व विद्युत साहित्य, प्लंबिग साहित्य खरेदी, उद्यानासाठी लागणारे साहित्य व कार्यालयीन खर्च यासाठी आवश्यक रक्कम. | ३५.९० |
| ५ | येऊर परिक्षेत्रातील शासकीय कार्यालये व विश्रामगृहांचे विद्युत, टेलिफोन, पाणीबिल व विद्युत साहित्य, प्लंबिग साहित्य खरेदी, उद्यानासाठी लागणारे साहित्य व कार्यालयीन खर्च यासाठी आवश्यक रक्कम. | ७.२५ |
| ६ | तुळशी परिक्षेत्रातील बांधील स्वरुपाची कामे, शासकीय कार्यालये पाणीबिल व विद्युत साहित्य, प्लंबिग साहित्य खरेदी, उद्यानासाठी लागणारे साहित्य व कार्यालयीन खर्च यासाठी आवश्यक रक्कम. | ३.७५ |
| ७ | कृष्णगिरी उपवन बोरीवली परिक्षेत्रातील उद्यान व शासकीय विश्रामगृहे देखभाल खर्च. | १५.०० |
| ८ | येऊर परिक्षेत्रातील उद्यान व शासकीय विश्रामगृहे देखभाल खर्च. | ३.५० |
| ९ | तुळशी परिक्षेत्रातील उद्यान व शासकीय विश्रामगृहे देखभाल खर्च. | १५.०० |
| १० | सिंह विहार /व्याघ्र विहार मधील मजुरांची मजुरी सुधारीत दरानुसार (कुशल १३ अकुशल ५१ मजुर असे एकूण -६४ मजूर) (माहे नोव्हेंबर, २०२१ ते मार्च, २०२२) एकूण ५ महिन्यांची मंजूरी | ३६.५३ |
| ११ | उद्यानातील बंदिस्त प्राणी व इतर प्राण्यांसाठी औषधे खरेदी, आहारावरील अत्यावश्यक खर्च (एकूण प्राणी-२५) (सिंह-३, वाघ-७, बिबट-१४, गिधाड-१) तसेच तृणभक्षक प्राणी यांचे खाद्य (चुना भुशी गाजर वैगरे.) | २४.२६ |
| १२ | सिंह विहार परिक्षेत्रातील देखभाल दुरुस्ती, साखळी जाळी पिंजरे दुरुस्ती, बंदिस्त वन्यप्राण्यांचे पिंजरे, साफसफाई व स्वच्छता साहित्य खरेदी (फिनाईल, झाडू, खराटा, डस्टर, साबण, निरमा पावडर, डांबर गोळी, ॲसिड, नॅपकिन इ. खरेदी कार्यालयीन खर्च व इतर किरकोळ इत्यादी आवश्यक खर्च | २४.७६ |
| १३ | पशुवैद्यकिय अधिकारी यांना जोखीम भत्ता. (प्रतिवर्षी १.२० लक्ष प्रमाणे सन २०२१-२२ करिता) (माहे सप्टेंबर, २०२१ ते मार्च, २०२२) एकूण ७ महिने | ०.७० |
| | **एकूण** | **३८३.४१** |

I. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रीक व प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

II. सदर शासन निर्णयान्वये वितरीत निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

III. सदर शासन निर्णयान्वये वितरीत निधी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावात नमूद कार्यबाबींवरच खर्च करण्याची जबाबदारी वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांची राहील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३३/२२/को. प्र.५, दिनांक ०९.०२.२०२१ अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१५१३०५२५९४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.02.15 13:10:35 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव (लेखा व कोषागार), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
३. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
८. वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान,बोरीवली.
९. उप सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
१०. कक्ष अधिकारी, कोषाप्रशा-५, वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
११. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
१२. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.